अधिकृत परंतू, तात्पुरत्या स्वरुपात मुद्रांक विक्री परवाना देण्याकरीता संबंधित मुद्रांक जिल्हाधिकारी यांना सशक्त तथा प्राधिकृत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मुद्रांक- २०२०/प्र.क्र.१४३/म-१(धोरण)**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**तारीख: २८ सप्टेंबर, २०२०**

वाचा -

१. मुंबई मुद्रांक विक्री व पुरवठा नियम, १९३४
२. मा.उच्च न्यायालय, मुंबई (औरंगाबाद खंडपीठ) यांचा रिट पिटीशन क्र.१४५४/२०१९ प्रकरणी दि.१४ मार्च, २०२० रोजीचा आदेश.

आदेश :-

केवळ प्रशासकीय सुलभता व गतीमानता साधण्याच्या उद्देशाने राज्यातील सर्व जिल्हयातील (मुंबई जिल्हा व मुंबई उपनगर जिल्हा वगळुन) मा.न्यायालयाच्या आवारात रु.५/- व रु.१०/- मुल्याचे न्यायालयीन चिकट मुद्रांक तसेच रु.१००/- मुल्याच्या अन्यायिक (non-judicial stamps) मुद्रांकाची विक्री करण्याकरीता रिट पिटीशन क्र.१४५४/२०१९ मधील मा.उच्च न्यायालयाच्या दि.१४ मार्च, २०२० रोजीच्या आदेशामध्ये नमुद इंडियन ॲडव्होकेट मल्टी स्टेट मल्टी पर्पज को-ऑप.सो. लि. या वकिल संघटनेला 'अधिकृत परंतू, तात्पुरत्या स्वरुपात मुद्रांक विक्री परवाना' देण्याकरीता मुंबई मुद्रांक विक्री व पुरवठा नियम, १९३४ (The Bombay Stamps Supply and Sale Rules, 1934) च्या नियम ७ च्या खंड (१) अन्वये संबंधित जिल्हयाचे मुद्रांक जिल्हाधिकारी तथा सह जिल्हा निबंधक यांना शासनाच्या वतीने सशक्त (empowered) तथा प्राधिकृत करण्यात येत आहे.

२. संबंधित संघटनेकडून मुद्रांक विक्री परवाना मिळण्याकरीता अर्ज प्राप्त झाल्यानंतर संबंधित जिल्हयाचे मुद्रांक जिल्हाधिकारी तथा सह जिल्हा निबंधक यांनी संबंधित संघटनेची मुद्रांक विक्री परवाना मिळण्याची नियमानुसार पात्रता तपासुन 'अधिकृत परंतू, तात्पुरत्या स्वरुपात मुद्रांक विक्री परवाना' देण्याची तातडीने कार्यवाही करावी.

३. उक्त मुद्रांक परवाना हा केवळ तात्पुरत्या स्वरुपात आणि तो ही केवळ रु.५/- व रु.१०/- मुल्याचे न्यायालयीन चिकट मुद्रांक तसेच रु.१००/- मुल्याच्या अन्यायिक (non-judicial stamps) मुद्रांकाची विक्री करण्याकरीता मर्यादित राहील.

४. सदरची विक्री ही फक्त नेमुण दिलेल्या मा.न्यायालयाच्या आवारातच करता येईल.

५. संबंधित संघटना ही नियमानुसार मुद्रांक विक्री करत असल्याबाबतच्या संनियंत्रणाची जबाबदारी ही संबंधित मुद्रांक जिल्हाधिकारी तथा जिल्हा सहनिबंधक यांचेवर राहील.

६. मुख्य नियंत्रक महसूल प्राधिकारी तथा नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी अशा 'अधिकृत परंतू, तात्पुरत्या स्वरुपात मुद्रांक विक्री परवाना' प्राप्त संघटनेच्या मुद्रांक विक्रीच्या कारभाराचा संबंधित मुद्रांक जिल्हाधिकारी तथा सह जिल्हा निबंधक यांचेमार्फत नियमित आढावा घेऊन शासनास अनुपालनात्मक अहवाल सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२८१६०००६३६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRITAMKUMAR VASANTRAO JAWALE

Digitally signed by PRITAMKUMAR VASANTRAO JAWALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=87cc7562ae4425665bebfcb265aa4a6ae1cea07b580617493a4425e224dee8d9, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=337788b3391c7f722143d26eeea9befcdad091509ef5236580a7d753d8635115, ou=REVENUE, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRITAMKUMAR VASANTRAO JAWALE
Date: 2020.09.28 16:03:37 +05'30'

**( प्रितमकुमार जावळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल महोदय, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (महसूल)/राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
५. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
८. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई सर्व विभागीय आयुक्त
९. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.अपर मुद्रांक नियंत्रक, प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई
११.महालेखापाल-१ व २ (मुंबई/नागपूर), महाराष्ट्र राज्य
१२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३.सर्व नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक (विभागीय कार्यालये)
१४.निवडनस्ती, कार्यासन म-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई